अर्थसंकल्पीय अनुदान-सन २०२५-२६
स्वच्छ भारत अभियान (ग्रा.)टप्पा-॥ अंतर्गत अनुसूचीत जाती घटकाखाली राज्य हिश्श्याकरिता प्राप्त केंद्र हिश्श्याच्या समरूप निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशीर्ष २२१५ A१४१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०२५/प्र.क्र.३८ /पापु-०८**

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: ३० एप्रिल २०२५

वाचा:-

१. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक: क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७.०४.२०२५.**
२. **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक: S-१२०११/१६/२०२५-SBM-I-DDWS, दि. ११.०४.२०२५.**
३. **सामाजिक न्याय व विशेष सहाय्य्य विभागाचे शासन परिपत्रक: क्र .विघयो-२०२५ / प्र.क्र. ५८/ अर्थसंकल्प दि. १५.०४.२०२५**

प्रस्तावना :-

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ योजनेअंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी (२२१५ A१४१) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरीता राज्य हिश्याअंतर्गत रु. ९३६८.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. केंद्र शासनाने वाचा क्र.०२ अन्वये स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ योजनेअंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी (२२१५ A१४१) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरीता केंद्र हिश्याअंतर्गत पहिल्या हप्त्याच्या पहिल्या टप्प्याकरिता रु. १५९१.९२ लक्ष (पंधरा कोटी एक्यान्नव लाख ब्यान्नव हजार फक्त) इतका निधी मंजूर केला आहे. स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा- ॥ अनुसुचित जाती घटका खालील केंद्र हिस्सा निधीस समरूप राज्य हिश्श्याखालील रू. १०६१.२८ लाख (रूपये दहा कोटी एकशष्ट लाख अठ्ठाविस हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. सदर निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन कडील योजनेच्या एसएनए- स्पर्श State Nodal Account (SNA)- SPARSH खात्यात जमा करणे आवश्यक आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वाचा क्र. ०३ अन्वये सदर निधी उपलब्ध करून दिला आहे. त्यानुषंगाने, केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ योजनेअंतर्गत

अनुसूचित जाती घटकासाठी राज्य शासनाकडे जमा केंद्र हिश्शाच्या समरूप  राज्य हिस्सा रू. रू. १०६१.२८ लाख (रूपये दहा कोटी एकशष्ट लाख अठ्ठाविस हजार फक्त) इतका निधी  वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-॥ योजनेअंतर्गत अनुसूचित जाती घटकासाठी (२२१५ A१४१) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरीता राज्य हिश्याचा रू. रू. १०६१.२८ लाख (रूपये दहा कोटी एकशष्ट लाख अठ्ठाविस हजार फक्त)  इतका निधी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात आहरित करुन, योजनेच्या एसएनए- स्पर्श State Nodal Account (SNA)- SPARSH खात्यात जमा करण्यासाठी अतिरक्त अभियान संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२.   सदर  निधी खर्च करण्यासाठी सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई या कार्यालयातील अवर सचिव, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना  आहरण व संवितरण अधिकारी तथा नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३.     शासन निर्णय निर्गमीत झाल्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी तथा नियंत्रक अधिकारी यांनी उक्त निधी SNA SPARSH प्रणालीवर कार्यान्वित करुन घ्यावा.

०४.       वरील निधीचा विनियोग करतांना केंद्र सरकारचे वित्त मंत्रालय,जलशक्ती मंत्रालय, तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मागदर्शक सूचना व प्रचलित निकष,वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे व अटी-शर्तींचे अनुपालन करावे.

०५.       हा खर्च "मागणी क्रमांक N-३, २२१५  पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२, मलप्रणाल व स्वच्छता ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना  (०१), अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०२) स्वच्छ भारत मिशन (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२१५ A१४१)" ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा.

०६.    सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०४.०४.२०२५ आणि शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य्य विभाग शासन परिपत्रक:  क्र विघयो-२०२५ / प्र.क्र. ५८/ अर्थसंकल्प दि. १५.०४.२०२५  अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४३०११५६४७१६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=0fea5cae29d80a4f500842e3ec1a32608f603b343a904f1f366c9491356ac06d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2025.04.30 11:57:36 +05'30'

**(राणी देवकत्ते)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

०१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

०२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

०३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.

०४. अभियान संचालक(स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन.

०५. जिल्हा समन्वयक,स्वच्छ भारत मिशन/उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.

०६. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.

०७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

०८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

०९. नियोजन विभाग, (कार्यासन-६) मंत्रालय, मुंबई.

१०. वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.

११. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.

१२. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. निवड नस्ती, कार्यासन पापु-०८.